आता आपण
तिथे आलो आहोत,
जिथे यायला
आपण भीत होतो.
आता आपण गुहेसमोर,
स्वच्छ सूर्यप्रकाशात नाही
तर गुहेतच आहोत
आणि अंधारात लाल डोळे
चकाकत आहेत.
आपण निश्चल अुभे आहोत
भयाच्या आणि थरकापाच्या क्षेत्रात
आता तीक्ष्ण नखांचा पंजा
आपल्यावर पडण्याची धास्ती
राहिलेली नाही.
तीक्ष्ण नखे आधीच
गळ्यात खुपसली गेलेली आहेत

ही तीक्ष्ण नखे आपलीच आहेत
तुझी आणि माझी
आता कळलो आपण ओकमेकांना
आणि स्वतःला,
अंधारात चकाकणारे लाल डोळे
आपलेच आहेत, तुझे आणि माझे,
आपणच घडवले आहे
भय आणि थरकापाचे हे क्षेत्र.


कालनिर्णय

प्रकाशक, कलादिग्दर्शन, अक्षरलेखन : भालचंद्र कुवल
रेखाचित्र : पंकज सोनावणे
कविता : वसंत आबाजी डहाके


